**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्र. बीव्हीपी-०११०/१०८/प्र.क्र.१३/ पोल-८
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक : २६ ऑगस्ट, २०१०.

**वाचा** :- १) महाराष्ट्र ग्राम पोलीस पाटील (सेवा प्रवेश, पगार भत्ते व सेवेच्या इतर शर्ती ) आदेश,१९६८
२) उपविभागीय अधिकारी, अमळनेर उपविभाग, जि. जळगांव यांचे पत्र क्र. दंडप्र/वतन/पोपा/काविं/१३०७/२०१०, दिनांक ११.३.२०१०

**प्रस्तावना :-** महाराष्ट्र ग्राम पोलीस पाटील (सेवा प्रवेश, पगार भत्ते व सेवेच्या इतर शर्ती ) आदेश, १९६८ मधील नियम क्र. ३ अन्वये पोलीस पाटील नेमणुकीकरिता पात्रता विहित केलेली आहे. तसेच दिनांक १४.५.२००२ व दिनांक ३१.८.२००२ च्या शासन निर्णयान्वये पोलीस पाटील पदावरील नियुक्तीकरिता इयत्ता १० वी उत्तीर्ण ही शैक्षणिक अर्हता निश्चित करण्यात आली आहे. मात्र, पोलीस पाटील भरतीबाबत अवलंबवायच्या कार्यपद्धतीबाबत निश्चित असे निदेश देण्यात आलेले नसल्याने, विविध जिल्ह्यांमध्ये पोलीस पाटील भरतीकरिता वेगवेगळ्या प्रक्रिया अवलंबण्यात येत असल्याचे निदर्शनास आले आहे. काही ठिकाणी केवळ लेखी परिक्षा, काही ठिकाणी केवळ मुलाखती तर काही ठिकाणी लेखी परिक्षा व मुलाखती असे दोन्ही घेण्यात येत असल्याचे आढळून आले आहे. त्यामुळे संपूर्ण राज्यातील पोलीस पाटील पद भरतीत सुसूत्रता आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- वरील बाबीचा सर्वांगिण विचार करुन शासन असे निदेश देत आहे की, पोलीस पाटील पदावरील नियुक्तीसाठी केवळ लेखी परिक्षा घेण्यात यावी, मुलाखत घेण्यात येऊ नये. लेखी परिक्षा इयत्ता १० वी उत्तीर्ण विद्यार्थ्यांच्या स्तरावरील सामान्य ज्ञान, स्थानिक परिसराची माहिती व चालू घडामोडी या विषयांवरील १०० गुणांची असावी.

२. सदर पद्धत हे आदेश निर्गमित करण्याच्या दिनांकापासून अंमलात आणावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( शहाजहान मुलाणी )
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग,महाराष्ट्र शासन.**

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व उपविभागीय अधिकारी (जिल्हाधिकारी यांच्यामार्फत)
सर्व पोलीस आयुक्त.
सर्व पोलीस अधिक्षक.
निवडनस्ती (पोल-८)

ROTA/H 2250(3/30-8-2010).
G:\११\Amalner-Jalgaon Bharti.lwp\१६